# महाराष्ट्र शासन

क्रमांक-तंमुगा १०१०/प्र.क्र. ५४/२०१०/पोल-१५,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६ जून, २०१०.

प्रति,
१) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हास्तरीय कार्यकारी समिती (सर्व जिल्हे),
२) पोलीस अधीक्षक तथा सदस्य सचिव, जिल्हास्तरीय कार्यकारी समिती (सर्व जिल्हे),

विषयः- **महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहीम - सन २००९-१०**
**जिल्हाबाहय मूल्यमापनासाठी जिल्हयांचे वाटप.**

महोदय,

शासन निर्णय क्रमांक तंमुगा/१००८/सीआर-४३/२००८/पोल-१५, दिनांक १४ ऑगस्ट, २००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-११ मध्ये मूल्यमापनाचे निकष आणि परिच्छेद-१२ मध्ये महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहीमेमध्ये भाग घेतलेल्या गावांचे मूल्यमापन करण्याकरिता मूल्यमापन समित्या स्थापन करणे व मूल्यमापनाची कार्यपध्दती विहित केली आहे. तसेच सदर शासन निर्णयात मूल्यमापनाचा कार्यक्रमही विहित करण्यात आलेला आहे. त्याप्रमाणे स्वयंमूल्यमापनानुसार तंटामुक्तीचे निकष पूर्ण करणाऱ्या ज्या गावांनी दिनांक १ मे, २०१० रोजी ग्रामसभा घेऊन "तंटामुक्त गाव" घोषित केले त्या गावांचे जिल्हा स्तरीय कार्यकारी समितीने जिल्हा मूल्यमापन समित्यांकडून दिनांक ५ मे, २०१० ते ५ जून, २०१० या कालावधीत जिल्हांतर्गत मूल्यांकन करावयाचे होते. सदर मूल्यांकन पूर्ण झाले असून दिनांक २५ जुलै, २०१० पूर्वी बाहय मूल्यमापनाचा अहवाल जिल्हा कार्यकारी समितीच्या मान्यतेने शासनास सादर करावयाचा आहे. दिनांक २० जून, २०१० ते २० जुलै, २०१० या कालावधीत जिल्हा बाहय मूल्यमापनासाठी जिल्हा मूल्यमापन समित्यांना पुढीलप्रमाणे जिल्हयांचे वाटप करण्यात येत आहेः-

**<u>जिल्हा बाहय मूल्यमापनासाठी जिल्हा मूल्यमापन समित्यांना जिल्हयांचे वाटप</u>** -

| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | जिल्हाबाहय मुल्यमापनासाठी दिलेला जिल्हा. |
|---|---|---|
| १ | ठाणे | रत्नागिरी |
| २ | रायगड | ठाणे |
| ३ | रत्नागिरी | सिंधुदुर्ग |
| ४ | सिंधुदुर्ग | रायगड |
| ५ | नाशिक | जळगाव |
| ६ | धुळे | नंदुरबार |
| ७ | नंदुरबार | अहमदनगर |
| ८ | जळगांव | धुळे |
| ९ | अहमदनगर | नाशिक |
| १० | पुणे | सोलापूर |
| ११ | सातारा | पुणे |
| १२ | सांगली | कोल्हापूर |
| १३ | सोलापूर | सातारा |
| १४ | कोल्हापूर | सांगली |
| १५ | औरंगाबाद | जालना |
| १६ | जालना | बीड |

| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | जिल्हाबाहय मुल्यमापनासाठी दिलेला जिल्हा. |
|---|---|---|
| १७ | परभणी | हिंगोली |
| १८ | हिंगोली | नांदेड |
| १९ | बीड | औरंगाबाद |
| २० | नांदेड | उस्मानाबाद |
| २१ | उस्मानाबाद | लातूर |
| २२ | लातूर | परभणी |
| २३ | अमरावती | यवतमाळ |
| २४ | बुलढाणा | वाशिम |
| २५ | अकोला | अमरावती |
| २६ | वाशिम | बुलढाणा |
| २७ | यवतमाळ | अकोला |
| २८ | नागपूर | भंडारा |
| २९ | वर्धा | नागपूर |
| ३० | भंडारा | वर्धा |
| ३१ | गोंदिया | चंद्रपूर |
| ३२ | चंद्रपूर | गडचिरोली |
| ३३ | गडचिरोली | गोंदिया |

२. दिनांक १५ ऑगस्ट,२००७ पासून महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहीम सुरु झाली असून सन २००८-०९ यावर्षात तंटामुक्त गाव आणि तंटामुक्त गाव शांतता पुरस्कारासाठी पात्र ठरलेल्या राज्यातील २८९० गावांना पुरस्काराची रक्कम वितरीत केली आहे. पुरस्कारप्राप्त गावांना पुन्हा पुरस्कार अनुज्ञेय करण्यात आलेला नाही. त्यामुळे यापूर्वी पुरस्कारप्राप्त गावांचे बाहयमूल्यमापन करण्यात येणार नाही.

३. वर दर्शविण्यात आल्यानुसार जिल्हाबाहय मूल्यमापन समित्यांनी उक्त दिनांक १४ ऑगस्ट, २००८ च्या शासन निर्णयातील मूल्यमापनासाठी विहित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार जिल्हांतर्गत मूल्यमापनात पात्र ठरलेल्या गावांचे मूल्यमापन करावे. विहित कालावधीत मूल्यांकन करणे अनिवार्य असून जिल्हाबाहय मूल्यमापनाचा अहवाल पाठविण्यास विलंब होणार नाही हे कटाक्षाने पहावे, ही विनंती.

आपला,

**( ना. भ. माकणे )**

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत माहितीस्तव सादर -

अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

प्रधान सचिव, ग्राम विकास व जल संधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

प्रत माहितीस्तव व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

सर्व विभागीय आयुक्त,

सर्व परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक.